**मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांना मेट्रो टप्पा २-ब प्रकल्पाच्या कास्टींग यार्ड, स्थानकामधून प्रवेश करण्याकरिता व बाहेर जाण्याकरिता, बायडक्ट, साईट ऑफीस, व मेट्रोच्या इतर अनुषंगिक कामकाजाकरिता मातृदुग्धशाळा, कुर्ला येथील जमीनीचा ताबा मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: दुवियो-१३१८/प्र.क्र.८७/पदुम-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०२ जानेवारी, २०१९.

वाचा- १) आयुक्त,दुग्धव्यवसाय विकास यांचे पत्र क्र.आदुवि-१६(३)/कुर्ला जमीन मेट्रो प्रकल्प /२ बी / प्र.क्र.११/२०१८/४५२८, दि.१०/१०/२०१८.

२) महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांचे पत्र क्र. मु.मेट्रो-२ब/भू.सं.पू.पू./१२७४/२०१८, दि. २६/०६/२०१८.

**प्रस्तावना-**

आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांनी त्यांच्या दि.२६/०६/२०१८ च्या पत्रान्वये मातृदुग्धशाळा, कुर्ला येथे उपलब्ध असलेल्या ९.५४ हेक्टर (९५४००चौ.मि.) क्षेत्रापैकी मेट्रो टप्पा २-ब प्रकल्पाच्या कास्टींग यार्ड, स्थानकामधून प्रवेश करण्याकरिता व बाहेर जाण्याकरिता, बायडक्ट, साईट ऑफीस, व मेट्रोच्या इतर अनुषंगिक कामकाजाकरिता १०३३८.२६ चौ.मि. क्षेत्राची जागा मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांना देण्याबाबत विनंती केलेली आहे.

आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांच्या मागणीच्या अनुषंगाने तसेच आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांनी केलेल्या शिफारशनुसार मेट्रो टप्पा २-ब प्रकल्पाच्या कास्टींग यार्ड, स्थानकामधून प्रवेश करण्याकरिता व बाहेर जाण्याकरिता, बायडक्ट, साईट ऑफीस, व मेट्रोच्या इतर अनुषंगिक कामकाजाकरिता मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने मागणी केलेली जागा कायमस्वरुपी देण्याबाबत आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांनी शासनस्तरावर निर्णय घेणेबाबत कळविले आहे. मेट्रो प्रकल्प हा शासनाचा महत्वाकांक्षी प्रकल्प असल्याने मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाची मागणी मान्य करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.  त्यास अनुसरुन खालीलप्रमाणे शासनाने निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांना मेट्रो टप्पा २-ब प्रकल्पाच्या कास्टींग यार्ड, स्थानकामधून प्रवेश करण्याकरिता व बाहेर जाण्याकरिता, बायडक्ट, साईट ऑफीस, व मेट्रोच्या इतर अनुषंगिक कामकाजाकरिता दुग्धव्यवसाय विकास विभागाच्या अधिपत्याखालील मातृदुग्धशाळा कुर्ला यांचे न. भू. क्र. ०२ पैकी १०३३८.२६ चौ.मि. क्षेत्रफळ कायमस्वरुपी नगर विकास विभागास हस्तांतरीत करण्याकरीता महसूल व वन विभागाकडे प्रत्यार्पित करण्यास खालील अटी व शर्तीवर शासन मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती.**

१) सदर जमीनीवर उभारण्यात येणाऱ्या बांधकामाचा प्रस्तावित प्रयोजनाव्यतिरिक्त इतर कोणत्याही प्रयोजनासाठी वापर करणे, जमीन गहाण अथवा तारण ठेऊन त्यावर कर्ज घेणे किंवा इतर मार्गाने जमीनीचे हस्तांतरण करणे अनुज्ञेय असणार नाही.

२) जमीन हस्तांतरणामुळे जमीनीशी संबंधित तसेच अन्य पर्यावरण विषयक कायद्यातील तरतूदींचे उल्लंघन होणार नाही, याबाबत आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, बांद्रा यांनी योग्य ती दक्षता घ्यावी.

३) MMRDA यांनी दाखल केलेल्या नकाशाप्रमाणे न.भु.क्र. ०२ पैकी १०३३८.२६ चौ.मी. इतकी जगा मोजणी करून त्यांना ताबा देण्याची कार्यवाही महाव्यवस्थापक मातृदुग्धशाळा कुर्ला यांनी करावी.

४) याबाबत उद्भवणाऱ्या न्यायालयीन अथवा अन्य प्रकरणात शासन जबाबदार राहणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१०२१२५९४२९५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anoop Kumar

Digitally signed by Anoop Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=257f78acf3ca20d9e91d7a73a76aa0240463e4aafdd4d13de68918dc20bad8e6, serialNumber=1c2ee608849bdb812849b6c8878f95607059b530ff717c8e39c09d06b394e02b, cn=Anoop Kumar
Date: 2019.01.02 13:17:17 +05'30'

( अनूप कूमार )
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
३) मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
४) मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
५) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद,विधानमंडळ सचिवालय,विधानभवन,मुंबई.

६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई.
७) प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव, (नवि-१), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) संचालक, मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. एमएमआरडीए बिल्डींग, बांद्रा-कुर्ला संकुल, मुंबई-५१
१०) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई.१८
११) आयुक्त,बृहन्मुंबई महानगर पालिका,मुंबई.
१२) अतिरिक्त महानगर आयुक्त व प्रकल्प संचालक, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, बांद्रा-कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
१३) जिल्हाधिकारी, मुंबई शहर,ओल्ड कस्टम हाऊस,मुंबई.
१४) जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा, बांद्रा(पूर्व), मुंबई.५१
१५) महाव्यवस्थापक,बृहन्मूंबई दूध योजना,वरळी,मुंबई-१८
१६) प्रभारी व्यवस्थापक,मातृदुग्धशाळा,कुर्ला.
१७) निवड नस्ती, पदुम-९.